**महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कुपरेज येथील कार्यालयात सीसीटीव्ही यंत्रणा बसविण्यासाठी होणारा खर्च सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मलोआ-१११८/प्र.क्र.१३/आठ**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १६ ऑगस्ट, २०१८

**वाचा: -**
१) उपसचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई यांचे पत्र क्र. सीसीटी ७८१५/सी.आर.१/२०१५/ तेवीस, दि.५ जानेवारी, २०१८.
२) शासन निर्णय सा.प्र.वि क्र. मलोआ १११८/प्र.क्र.१३/आठ, दि. २३ मार्च, २०१८.
३) उपसचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई यांचे पत्र क्र. सीसीटी ७८१५/सी.आर.१/२०१५/ तेवीस, दि.२७ एप्रिल, २०१८, १८जून, २०१८ व ६ जुलै, २०१८.
४) शासन पत्र क्र. मातंस ०७७/२०१६-०/O-DIT(MH), दि. १७ मे, २०१७

**प्रस्तावना-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगास सीसीटीव्ही यंत्रणा खरेदी करुन आयोगाच्या कार्यालयात २५ आयपी बेस्ड सीसीटीव्ही कॅमेरे बसविण्यास व सदर प्रयोजनासाठी होणारा एकूण रु. १३,८७,३०३/- इतक्या खर्चास व सदर खर्च सन २०१७-१८ च्या मंजूर तरतूदीतून भागविण्यास संदर्भ क्रमांक. २ येथील दि. २३ मार्च, २०१८ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली होती. तथापि महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने दि. ६.७.२०१८ च्या पत्रान्वये सन २०१७-१८ च्या तरतूदीतून उपरोक्त खर्च करणे प्रशासकीय कारणास्तव शक्य न झाल्याने सदर खर्च सन २०१८-१९ या वित्तीय वर्षातून भागविण्यास मान्यता मिळण्याची विनंती केली. ही बाब पाहता प्रस्तुत प्रयोजनासाठी होणारा खर्च सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती त्यानुसार खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यपध्दतीत सुधारणा व अधिक पारदर्शकता होणेची गरज आहे. महाराष्ट्र लोकसेवा आयोग, कुपरेज मुंबई या कार्यालयात २५ आयपी बेस्ड सीसीटीव्ही कॅमेरे बसविण्यास व त्याकरीता येणा-या रु. १३,८७,३०३/-(रु. तेरा लाख सत्त्याऐंशी हजार तीनशे तीन

फक्त) च्या खर्चास संदर्भ क्रमांक २ येथील शासन निर्णयात नमूद अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रस्तुत बाबीवर होणारा खर्च रु. १३,८७,३०३/-(रु. तेरा लाख सत्याऐशी हजार तीनशे तीन फक्त) हा "मागणी क्र.अे-३, २०५१- लोकसेवा आयोग, १०२- राज्य लोकसेवा आयोग, (००)(०१)महाराष्ट्र लोकसेवा आयोग, १७-संगणक खर्च (अनिवार्य) (२०५१ ००१३)" या लेखाशीर्षांतर्गत सन २०१८-१९ च्या आर्थिक वर्षातील मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.१०६/२०१७, व्यय-४, व अनौ. संदर्भ क्र. १२५/२०१८, कोषा प्र-५, दि.१७/३/२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीस अनुसरुन तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग -एक, अ.क्र.६ नियम क्र. ४० मधील अटींच्या अधीन राहून व प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१८०८१६१५५२५६१८०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajendra Pandurang Wagh

Digitally signed by Rajendra Pandurang Wagh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9e4468a63fe9f9f2a565a0790f46e3c14a3715b2370430433845720a9c4c8107, serialNumber=7adb1868a49b8719e27d3453044671a8ceddbd04af26dd2089ed03e6b1bd92bd, cn=Rajendra Pandurang Wagh
Date: 2018.08.16 16:34:49 +05'30'

**( राजेंद्र वाघ )**
**अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग**
**महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (३ प्रती)
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा) - १/२, महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
५) वित्त विभाग (विनियम/व्यय-४), मंत्रालय, मुंबई.
६) सामान्य प्रशासन विभाग (का-२५/३९).
७) निवड नस्ती (का-८).